नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम २००० च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी नागरी घनकचरा व्यवस्थापन व मलनि:सारण या विषयावर आधारीत वेगवेगळ्या तंत्रज्ञानाची माहिती व वापर करण्यासाठी तंत्रज्ञान व पुरवठादारांच्या राज्यस्तीय अनुसूची तयार करण्यासंदर्भात गठीत केलेल्या तांत्रिक सल्लागार समितीस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः घकव्य २०१२/प्र.क्र.६९८/पापु-२२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीखः २९ जानेवारी, २०१५.

**वाचा :**

**१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः घकव्य २०१२/प्र.क्र.६९८/पापु-२२, दिनांक १८ एप्रिल, २०१३,**

**२) सदस्य सचिव, तांत्रिक सल्लागार समिती तथा संचालक, महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी आणि संशोधन संस्था (मित्रा), नाशिक यांचे पत्र क्रमांक मीत्रा/तांशा-४/६३६/२०१४, दिनांक ३०.०६.२०१४.**

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान, २०१० अंतर्गत राज्य निर्मल बनविण्याकरीता राज्याच्या नागरी भागातील घनकच-याच्या शास्त्रोक्त व सुयोग्य व्यवस्थापनाअंतर्गत नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम २००० च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी नागरी घनकचरा व्यवस्थापन व मलनि:सारण या विषयावर आधारीत वेगवेगळ्या तंत्रज्ञानाची माहिती व वापर करण्यासाठी शहरी व ग्रामीण भागासाठी तंत्रज्ञान व पुरवठादारांची राज्यस्तरीय अनुसूची तयार करण्यासंदर्भात तांत्रिक सल्लागार समिती दिनांक १८ एप्रिल, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली आहे. या समितीने आपला प्राथमिक अहवाल ३ महिन्यांत व अंतिम अहवाल ६ महिन्यांच्या कालावधीत शासनास सादर करणे आवश्यक होते. क्षेत्रिय स्तरावर येणा-या अडचणी विचारात घेऊन समितीचा कालावधी दिनांक ३१.०३.२०१५ पर्यंत वाढवावा अशी विनंती समितीच्या सदस्य सचिव यांनी केली होती. त्या अनुषंगाने समितीस अंतिम अहवाल शासनास सादर करण्याकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान, २०१० अंतर्गत राज्य निर्मल बनविण्याकरीता राज्याच्या नागरी भागातील घनकच-याच्या शास्त्रोक्त व सुयोग्य व्यवस्थापनाअंतर्गत नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २००० च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी नागरी घनकचरा व्यवस्थापन व मलनि:सारण या विषयावर

आधारीत वेगवेगळ्या तंत्रज्ञानाची माहिती व वापर करण्यासाठी शहरी व ग्रामीण भागासाठी तंत्रज्ञान व पुरवठादारांची राज्यस्तरीय अनुसूची तयार करण्यासंदर्भात गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक सल्लागार समितीस अंतिम अहवाल शासनास सादर करण्यासाठी आता दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. समितीने त्यांच्या अंतिम अहवालासोबत आतापर्यंत घेण्यात आलेल्या बैठकीच्या इतिवृत्तांच्या प्रती शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२९१६०३५९८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sule Vaishali M

Digitally signed by Sule Vaishali M
DN: CN = Sule Vaishali M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2015.01.30 15:04:46 +05'30'

**( वैशाली सुळे )**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर, नरिमन पॉईंट, मुंबई,
५. संचालक, नगरपरीषद संचालनालय, वरळी, मुंबई,
६. संचालक (पर्यावरण), नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई,
७. मुख्य अभियंता, अद्ययावत तंत्रज्ञान सहाय्य, म.जी.प्रा., नाशिक,
८. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे,
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,
१०. संचालक, वेस्टर्न झोन व वरिष्ठ वैज्ञानिक, निरी, वरळी, मुंबई १८,
११. संचालक, आय.आय.टी., मुंबई,
१२. प्रा.विरेंद्र सेठी, प्राध्यापक, आय.आय.टी., मुंबई,
१३. प्रा.शाम असोलेकर, प्राध्यापक, आय.आय.टी, मुंबई,
१४. डॉ. स्नेहा पळणीटकर, संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, मुंबई,
१५. संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, फोर्ट, मुंबई,

१६. अधिक्षक अभियंता, मित्र (संशोधन व प्रशिक्षण केंद्र, म.जी.प्रा. नाशिक),
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
२०. आयुक्त, सर्व महानगरपालिका,
२१. सर्व वैधानिक विकास मंडळे,
२२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरीषदा,
२३. वित्त विभाग (व्यय-३ / अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई,
२४. सह / उप सचिव (नागरी स्वच्छता), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. निवडनस्ती (पापु-२२ कार्यासन)